**<u>सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषद यांनी सन २०१६-१७ व सन २०१७-१८ या कालावधीतील गोपनीय अहवाल लिहिताना स्वच्छ महाराष्ट्र अभियान अंतर्गत करण्यात आलेल्या प्रगतीचा स्पष्ट उल्लेख करण्याबाबत व गोपनीय अहवालात नोंद घेण्याबाबत.</u>**

# महाराष्ट्र शासन

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: एमसीओ-२०१७/प्र.क्र.१९ (२)/नवि-१४**

मंत्रालय, मुख्य इमारत, चौथा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ३० जानेवारी, २०१७

**संदर्भ:-** उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे पत्र क्र.सीपीएफ-१०१६/ प्र.क्र.७७४/२०१६/दहा, दि.२२.१२.२०१६.

**<u>प्रस्तावना</u>:-**

संदर्भाधीन पत्रान्वये सामान्य प्रशासन विभागाने अशा सूचना दिल्या आहेत की, महाराष्ट्र संपूर्ण हगणदारीमुक्त करण्याची कार्यवाही जलदपणे व प्रभावीपणे होण्याच्या दृष्टीने क्षेत्रीय अधिकाऱ्यांवर त्याची जबाबदारी निश्चित करणे आवश्यक आहे. त्यानुषंगाने सर्व जिल्हा परिषद मुख्य कार्यकारी अधिकारी, महानगरपालिका आयुक्त व मुख्याधिकारी, नगरपरिषद यांच्या सन २०१६-१७ व सन २०१७-१८ या कालावधीतील गोपनीय अहवालांमध्ये या योजनांमध्ये केलेल्या प्रगतीचा स्पष्ट उल्लेख करण्यात यावा.

**<u>शासन निर्णय</u>:-**

सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त सूचनांस अनुसरून असे स्पष्ट करण्यात येत आहे की, राज्यातील सर्व नगरपरिषदा दि.३१.०३.२०१७ पर्यंत हगणदारीमुक्त करण्याचे उद्दिष्ट ठेवण्यात आले आहे. त्यादृष्टीने हगणदारीमुक्तीचे उद्दिष्ट जलदगतीने व प्रभावीपणे साधता यावे, म्हणून सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषद यांना अशा सूचना देण्यात येत आहेत की, **त्यांनी सन २०१६-१७ या कालावधीतील गोपनीय अहवाल लिहिताना यासाठी करण्यात आलेल्या प्रगतीचा स्पष्ट उल्लेख करावा.**

**२. तसेच सर्व प्रतिवेदन अधिकारी (नगराध्यक्ष) व पुनर्विलोकन अधिकारी (जिल्हाधिकारी) यांना सूचित करण्यात येते की, ज्या नगरपरिषदा दिनांक ३१.०३.२०१७ पर्यंत हगणदारीमुक्त म्हणून घोषित/प्रमाणित करण्याची कार्यवाही पूर्ण करतील. अशांच्या बाबतीत संबंधित मुख्याधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात त्यांच्या उल्लेखनीय कामगिरीबद्दल अनुकुल शेरे नोंदविण्यात यावेत.**

**तसेच ज्या नगरपरिषदांच्या बाबतीत त्या दिनांक ३१.०३.२०१७ पर्यंत हगणदारीमुक्त म्हणून घोषित करण्याची/प्रमाणित करून घेण्याची कार्यवाही न झाल्यास संबंधित मुख्याधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात**

**प्रतिकुल शेरे नोंदविण्यात यावेत, अशा सूचना सर्व संबंधित प्रतिवेदन अधिकारी (नगराध्यक्ष) व पुनर्विलोकन अधिकारी (जिल्हाधिकारी) यांना देण्यात येत आहेत.**

**तसेच यासंदर्भात पुढे असेही स्पष्ट करण्यात येत आहे की, संबंधित मुख्याधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालातील अनुकुल व प्रतिकुल शेऱ्यांची नोंद शासनस्तरावरही घेण्यात येणार आहे. याची सर्व मुख्याधिकारी, संबंधित प्रतिवेदन/पुर्नविलोकन अधिकारी यांनीही नोंद घ्यावी.**

**३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०१३०१६३९५७४५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2017.01.30 16:44:50 +05'30'

**(ज. ना. पाटील)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
३. सर्व विभागीय आयुक्त.
४. सर्व जिल्हाधिकारी.
५. उप सचिव, नगर विकास विभाग/नवि-३४, मंत्रालय, मुंबई.
६. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी), महाराष्ट्र नागरी विकास अभियान संचालनालय, द्वारा महाराष्ट्र नागरी सुविधा विकास कंपनी म., तळमजला, सीआर-२, बॅ.रजनी पटेल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई.
७. सर्व अध्यक्ष, नगरपरिषदा.
८. राज्यातील सर्व नगरपरिषदा यांचे मुख्याधिकारी.
९. विभागातील सर्व सहसचिव/उपसचिव.
१०. निवडनस्ती (नवि-१४).